**लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील पात्र शिधापत्रिकाधारकांना सन २०२४ च्या गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणांनिमित्त "आनंदाचा शिधा" वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आशिवि-२०२४/प्र.क्र.९/ना.पु.२२**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब शिधापत्रिकाधारक तसेच छत्रपती संभाजीनगर व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा या १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांतील दारिद्र्य रेषेवरील (एपीएल) केशरी शेतकरी शिधापत्रिकाधारकांना सणासुदीच्या काळात सवलतीच्या दरात खाद्यवस्तू उपलब्ध करून देण्याकरीता सन २०२२ च्या दिवाळी, सन २०२३ च्या गुढीपाडवा-डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ., गौरी-गणपती उत्सव, दिवाळी सणांनिमित्त प्रत्येकी १ किलो या परिमाणात रवा, चणाडाळ, साखर व १ लिटर या परिमाणात खाद्यतेल हे शिधाजिन्नस समाविष्ट असलेला १ संच (आनंदाचा शिधा) ₹ १००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत राज्यात श्री राम प्राणप्रतिष्ठा सोहळा-छ. शिवाजी महाराज जयंतीनिमित्त "आनंदाचा शिधा" चे वितरण सुरू आहे. त्याचधर्तीवर दि.१४.०२.२०२४ रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळ बैठकीमध्ये देण्यात आलेल्या निर्देशांनुसार, उपरोक्त पात्र शिधापत्रिकाधारकांना **सन २०२४ च्या गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणांनिमित्त** प्रत्येकी १ किलो या परिमाणात रवा, चनाडाळ, साखर व १ लिटर या परिमाणात सोयाबीन तेल हे शिधाजिन्नस समाविष्ट असलेला "आनंदाचा शिधा" ई-पॉस प्रणालीद्वारे ₹ १००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :-**

१. लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब शिधापत्रिकाधारक तसेच छत्रपती संभाजीनगर व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा या १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांतील दारिद्र्य रेषेवरील (एपीएल) केशरी शेतकरी अशा एकूण १,६९,२४,६३७ शिधापत्रिकाधारकांना **आगामी गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती इ. सणंनिमित्त प्रत्येकी १ किलो या परिमाणात रवा, चनाडाळ, साखर व १ लिटर या परिमाणात सोयाबीन तेल** हे शिधाजिन्नस समाविष्ट असलेला शिधाजिन्नस संच **"आनंदाचा शिधा"** खरेदी करण्याकरीता Mahatenders या ऑनलाईन पोर्टलद्वारे राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेस याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर "आनंदाचा शिधा" शिधाजिन्नस संच खरेदी करण्याकरीता निविदा प्रक्रियेअंती गुनिना कमर्शिअल्स प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या न्यूनतम दराने उपरोक्त शिधाजिन्नस संच खरेदी करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३. माहे मार्च,२०२४ मध्ये लागू होणारी आचार संहिता विचारात घेता, सदर आचार संहितेच्या कालावधीमध्ये प्रस्तावित ४ शिधाजिन्नस समाविष्ट असलेला शिधाजिन्नस संच “आनंदाचा शिधा” प्रतिशिधापत्रिका १ याप्रमाणे ई-पॉसद्वारे राज्यातील पात्र लाभार्थ्यांना ₹१००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने उपरोक्त सणांकरीता वितरीत करण्यास सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२८.०२.२०२४ च्या शासन परिपत्रकान्वये गठीत छाननी समितीची शिफारस व त्यानुषंगाने भारत निवडणूक आयोगाच्या निर्णयाच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर “आनंदाचा शिधा” शिधाजिन्नस संच खरेदी करण्याकरीता निविदा प्रक्रियेअंती प्राप्त झालेल्या दरानुसार (₹३१४/- प्रतिसंच) खरेदी खर्च ₹५३१.४३ कोटी व इतर अनुषंगिक खर्च ₹१९.१४ कोटी यासह एकूण ₹५५०.५७ कोटी इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

५. उपरोक्त प्रयोजनासाठी येणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर खरेदीसाठी येणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये ४४०८, अन्न साठवण व वखार यावरील भांडवली खर्च ०१ अन्न, १०१ प्रापण व पुरवठा, ०२ प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण, (०२) (०१) मुंबई शहर - खरेदीची किंमत (अनिवार्य), २१, पुरवठा व सामग्री (४४०८००७७) या लेखाशीर्षाखाली व अनुषंगिक खर्च ४४०८, अन्न साठवण व वखार यावरील भांडवली खर्च ०१ अन्न, १०१ प्रापण व पुरवठा, ०२ प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण, (०२) (०५) मुंबई शहर- अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) ४४०८०२६४ या लेखाशीर्षखाली मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीतून भागविण्याकरीता मान्यता देण्यात येत आहे.

तसेच विक्रीतून जमा होणारी रक्कम लेखाशीर्ष ४४०८०१६६ (मुंबई) व लेखाशीर्ष ४४०८०१७५ (मुफसल) यामध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याचप्रमाणे एकूण होणाऱ्या खर्चामधून जमा होणारी रक्कम वजा जाता येणारी तूट (०३) (०७) अन्न धान्य व्यवहारातील तूटीच्या प्रतिपूर्ती अर्थसहाय्यासाठी अनिवार्य (२४०८०४११) ३३, अर्थसहाय्य लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११०/व्यय १०, दि. ०४.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२२५६५७६५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2024.03.15 23:06:16 +05'30'

**( पुजा मानकर )**
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१६. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१७. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१८. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
२६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२९. वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
३०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३१. गुनिना कमर्शिअल्स प्रायव्हेट लिमिटेड,२०२, शारदा चेंबर, १५, सर विठ्ठलदास ठक्करसी मार्ग,न्यु मरिन लाईन्स, चर्चगेट, मुंबई-४०००२०.
३२. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).